**ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त अधिकारी /कर्मचारीवृंद यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या मंजूरीबाबत अनुज्ञेयतेची कमाल मर्यादा व मंजूरीच्या अधिकारात सुधारणा करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वैप्रबि-२०१४/प्र.क्र. ४१० /आस्था-९

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीखः १० सप्टेंबर, २०१५

**वाचा**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२ क्रमांकः वैखप्र-२०१५/प्र.क्र.८२/२०१५, दिनांक -२४ ऑगस्ट, २०१५

२) शासन पत्र ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांकः वैखप्र-२०११/प्र.क्र.४५९/आस्था-९, दिनांक-०७ जानेवारी,२०१२

**प्रस्तावना**

ग्राम विकास विभागाकडील कर्मचा-यांची एकूण संख्या तसेच शासनाकडे प्राप्त होणा-या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या प्रकरणांची मोठया प्रमाणावरील संख्या,वैद्यकीय खर्चात झालेली वाढ या सर्व बाबी विचारात घेता ग्राम विकास विभागासाठी विभाग प्रमुखांची रु.१.०० लक्ष पर्यंतची वैद्यकीय प्रतिपूर्तीचे अधिकार रु. ३.०० लक्ष पर्यंत वाढविण्याबाबत सार्वजनिक आरोग्य विभागास विनंती करण्यात आली होती.

सार्वजनिक आरोग्य विभागाकडून संदर्भांकीत शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट,२०१५ अन्वये विभाग प्रमुखांच्या वैद्यकीय प्रतिपुर्तीच्या अनुज्ञेयतेची कमाल मर्यादा मंजूरीच्या अधिकारात सुधारणा करण्यात आली आहे. सदर सुधारणेनुसार मुख्य कार्यकारी अधिकारी यांची वैद्यकीय खर्च प्रतिपुर्तीची मर्यादा रु. १.०० लाखावरुन रु. २.०० लाख करण्यात आली आहे. तर विभागीय आयुक्तांची रु. १.०० लाख वरुन रु. ३.०० लाखापर्यंत करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त जिल्हा परिषदेतील गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचा-यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या मंजुरीबाबत खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय

जिल्हा परिषद कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम,१९६१ मधील तरतूदीच्या अधीन राहून, आकस्मिक उद्भवणा-या २७ आजारांवर शासनाने मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील तसेच ५ गंभीर आजारांवर, शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपुर्तीसाठी वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रु. १,००,०००/- च्या कमाल मर्यादेत प्रतिपूर्तीस मंजूरी देण्याचे अधिकार संदर्भाधीन शासन निर्णय / शासन पत्रान्वये संबंधीत विभाग प्रमुखांना आहेत.

२. महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल ) नियम,१९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयाच्या तरतूदीच्या अधीन राहून वित्तीय अधिकारात सार्वजनिक आरोग्य विभागाने केलेल्या सुधारणेप्रमाणे ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या जिल्हा परिषदासाठी खालील प्रमाणे बदल करण्यात येत आहे.

| अधिकारी | पूर्वीचे अधिकार | सुधारीत अधिकार |
|---|---|---|
| मुख्य कार्यकारी अधिकारी | रु. १,००,०००/- पर्यंन्त | रु. २,००,०००/- |
| विभागीय आयुक्त | -- | रु. २,००,००१/- ते रु.३,००,०००/- |

.

३. रु. ३,००,०००/- वरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या प्रकरणांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल ) नियम ,१९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील तरतूदीच्या अधीन राहून मंजूरी देण्याचे अथवा उचित निर्णय घेण्याचे पूर्ण अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुखांना राहतील.

४. वर नमूद केल्याप्रमाणे विभाग प्रमुखस्तरावर रु.२,००,०००/- पर्यंन्तची वैद्यकीय देयके मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांना तसेच रु. २,००,००१/- ते रु. ३,००,०००/- पर्यन्तची वैद्यकीय देयक प्रतिपुर्ती प्रकरणांना विभागीय आयुक्त यांनी मंजूरी देताना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम,१९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील तरतुदी काटेकोरपणे तपासावी व नंतरच मंजूरी देण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय या निर्णयाच्या दिनांकाला प्रलंबित प्रकरणांना ही लागू राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१०१७२२२५१८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Eknath Kulkarni

Digitally signed by Anil Eknath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Anil Eknath Kulkarni
Date: 2015.09.10 17:32:03 +05'30'

(अनिल कुलकर्णी)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
प्रबंधक, मूळशाखा, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद ) मुंबई
सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), मुंबई.
महालेखापाल- २ ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे ) कोकण भवन, नवी मुंबई
अपर मुख्य सचिव (वित्त ) , मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
सचिव , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
विभागीय आयुक्त, कोकण भवन, नवी मुंबई / नाशिक / पुणे / औरंगाबाद / अमरावती / नागपूर
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व )
सहसचिव/उपसचिव /अवरसचिव / कक्षअधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग मंत्रालय मुंबई-३२
निवड नस्ती आस्था-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय मुंबई-४०० ०३२